**सोलापूर जिल्ह्यासाठी सोलापूर जिल्हा सुरक्षा रक्षक मंडळाची स्थापना करण्यासंदर्भात विहीत करण्यात आलेल्या अटींची पूर्तता करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : एसजीए-२०१६/प्र.क्र. ३५५/कामगार-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २१ डिसेंबर, २०१६.

वाचा:- १) कामगार आयुक्त कार्यालयाचे क्रमांक- सोसुरमंप्र/२०१६/कार्या-१४/८७९, दि.०६/०९/२०१६ रोजीचे पत्र
२) शासन अधिसूचना क्र.एसजीए-२०१६/प्र.क्र.३५५(१)/कामगार-५, दि.२०/१२/२०१६
३) शासन अधिसूचना क्र.एसजीए-२०१६/प्र.क्र.३५५(२)/कामगार-५, दि.२०/१२/२०१६

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र खाजगी सुरक्षा रक्षक (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम, १९८१ अंतर्गत सांगली जिल्हा सुरक्षा रक्षक मंडळाचे कार्यक्षेत्र सांगली व सातारा जिल्ह्यापुरतेच मर्यादित ठेवण्यात येऊन सोलापूर जिल्ह्याकरीता स्वतंत्र सुरक्षा रक्षक मंडळाची स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी दिनांक ०६/०९/२०१६ रोजी सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने सोलापूर जिल्ह्यातील खाजगी सुरक्षा रक्षकांची सेवा प्राप्त करणाऱ्या आस्थापना/कारखान्यांची संख्या, मंडळाची आर्थिक क्षमता इ. बाबींचा सर्वंकष विचार करुन विहीत अटींच्या अधीन राहून सोलापूर जिल्हा सुरक्षा रक्षक मंडळ स्थापन करण्याबाबतच्या प्रस्तावास शासनाची मान्यता प्राप्त झाली आहे. त्यानुसार महाराष्ट्र खाजगी सुरक्षा रक्षक (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम, १९८१ च्या कलम ६(१) मधील तरतुदीनुसार शासन अधिसूचना दिनांक २०/१२/२०१६ अन्वये सोलापूर जिल्ह्यासाठी "सोलापूर जिल्हा सुरक्षा रक्षक मंडळ" स्थापन करण्यात आले आहे. सोलापूर जिल्हा सुरक्षा रक्षक मंडळाचे कामकाज प्रभावीपणे व सक्षमरित्या सुरु होण्याच्या दृष्टीने खालील नमूद अटींची अंमलबजावणी करण्यासंदर्भात सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

सोलापूर जिल्हा सुरक्षा रक्षक मंडळ स्थापन करण्याकरीता खालील अटींची अंमलबजावणी काटेकोरपणे करण्यात यावी:-

(अ) नव्याने स्थापन करण्यात आलेल्या सोलापूर जिल्हा सुरक्षा रक्षक मंडळाच्या अध्यक्ष व सचिव पदाचा कार्यभार अनुक्रमे संबंधित जिल्ह्याचे सहायक कामगार आयुक्त व सरकारी कामगार अधिकारी यांना अतिरिक्त स्वरुपात देण्यात यावा.

(ब) मंडळाच्या अध्यक्ष व सचिव पदाचा कार्यभार अतिरिक्त स्वरुपात देण्यामुळे उक्त अधिकारी मंडळात पूर्णवेळ उपलब्ध होऊ शकत नसल्याने मंडळाचे कामकाज इतरवेळीही सुरळीतपणे पार पाडण्यासाठी मंडळात एका कार्मिक अधिकाऱ्याची नियुक्ती करण्यात यावी. तथापि, सुरुवातीस ही पदे शासनाच्या प्रचलित धोरणानुसार कंत्राटी पध्दतीने नियुक्ती देऊन कार्यरत करण्यात यावीत.

(क) नव्याने निर्माण करण्यात आलेल्या सोलापूर जिल्हा सुरक्षा रक्षक मंडळासाठी सुरुवातीस कार्यालयीन जागा घेण्याची आर्थिक क्षमता राहणार नसल्याने त्यांचे कार्यालय सोलापूर येथील सहायक कामगार आयुक्त यांचे कार्यालयात सुरु करण्यात यावे.

(ड) सोलापूर जिल्ह्यातील खाजगी सुरक्षा रक्षकांची सेवा प्राप्त करणाऱ्या आस्थापना/ कारखान्यांची संख्या तसेच कार्यरत प्रस्तावित खाजगी सुरक्षा रक्षकांची संख्या विचारात घेता जास्तीत जास्त आस्थापना तसेच सुरक्षा रक्षकांची विहीत कार्यपध्दतीनुसार सोलापूर जिल्हा सुरक्षा रक्षक मंडळात नोंदणी करुन घेण्यासाठी एक विशेष मोहिम मंडळामार्फत राबविण्यात यावी. सदरहू प्रक्रिया ही तीन महिन्यांच्या कालावधीत पार पाडणे मंडळावर बंधनकारक असेल.

(इ) मंडळाला प्राप्त होणाऱ्या प्रशासकीय लेव्हीमध्ये वाढ होऊन मंडळ आर्थिकदृष्ट्या सक्षम झाल्यानंतर मंडळासाठी स्वतंत्र कार्यालय तथा कर्मचारीवृंद नियुक्त करता येईल. त्याकरीता महाराष्ट्र खाजगी सुरक्षा रक्षक (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम, १९८१ अंतर्गत योजना, २०१२ च्या कलम १३ व १४ मधील तरतुदीनुसार मंडळामार्फत सदरहू कार्यवाही करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१६१२२११६४१२८५०१० असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यापाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Varsha M Bharose

Digitally signed by Varsha M Bharose
DN: CN = Varsha M Bharose, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2016.12.21 16:45:44 +05'30'

**(व. मुं. भरोसे)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत-**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक
४) महाराष्ट्र राज्यातील सर्व मा.विधानसभा व विधानपरिषद सदस्य
५) मा.मुख्य सचिव यांचे खाजगी सचिव
६) सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक
७) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (२ प्रती)
८) कामगार आयुक्त, कामगार भवन, सी-२०, ई-ब्लॉक, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई.
९) अपर कामगार आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
१०) उप कामगार आयुक्त/सहायक कामगार आयुक्त तथा अध्यक्ष, सर्व जिल्हा सुरक्षा रक्षक मंडळे, महाराष्ट्र राज्य मुंबई.
११) निवडनस्ती (कामगार-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.